पिंपरी चिंचवड महानगरपालिका,पिंपरी
जि.पुणे या संस्थेस पवना,आंद्रा व भामा
आसखेड जलाशयातून बिगर सिंचन पार्ण
आरक्षण प्रस्तावास मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक.बिसिंआ २०१८/(३९१/१८)/सिं.व्य.(धो)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४/१०/२०१८

**संदर्भ**:- १) शासन पत्र क्र.बीकेएस २००८/(२०९/२००८)/सिंव्य (धो) दि. १३/५/२००८
२) शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१४/(०१/२०१४)/सिंव्य (धो),दि.६/३/२०१४
३) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र दि.२३/७/२०१८
४) आयुक्त पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. क्र.जशुके/पापु/२९९/२०१८, दि. १३/८/२०१८
५) जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण १००१/ (१५४/०१) सिंव्य(धो), दि.२१/१/२००३
६) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण) दि. १६/८/२०१४
७) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१५/(४४/१५)/सिंव्य (धोरण) दि. १७/११/२०१६
८) शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/१५)/सिंव्य (कामे) दि. १७/११/२०१६

**प्रस्तावना:-**

१. पिंपरी चिंचवड महानगरपालिकेकरीता संदर्भ क्र.१ नुसार पवना प्रकल्प (टप्पा क्र.४) मधून ४८.५७६ दलघमी बिगर सिंचन आरक्षणास मंजूरी देण्यात आली होती. तसेच संदर्भ क्र. २ नुसार सदर संस्थेस आंद्रा प्रकल्पातून ३६.८७ दलघमी व भामा आसखेड धरणातून ६०.७९ दलघमी बिगर सिंचन आरक्षणास मंजूरी देण्यात आली होती.

२. संदर्भ क्र. ३ अन्वये पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी जि.पुणे या संस्थेस पवना,आंद्रा व भामा आसखेड जलाशयातून बिगर सिंचन पाणी आरक्षण मंजूरीचा प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. या प्रस्तावावरुन असे दिसून येते की, पवना (टप्प क्र. ४), आंद्रा व भामा आसखेड या तिन्ही प्रकल्पातून बिगर सिंचन पाणी वापरापोटी भरावयाचा सिंचन पुर्नस्थापना खर्चाची रक्कम विहित मुदतीत न भरल्याने करारनामा करता आला नाही त्यामुळे मुख्य अभियंता यांनी सदरचे आरक्षण रद्द केल्याचे कळविले आहे.

पूर्वीचे मंजूर आरक्षण हे त्या त्यावेळी सक्षम प्राधिकाराने व सक्षम स्तरावर प्रचलित मापदंड व नियमानुसार मंजूर आहे. त्यामुळे यापूर्वीच्या पवना,आंद्रा व भामा आसखेड जलाशयातून मंजूर आरक्षणानुसार करारनामा करण्यासाठी मुदतवाढ देणे, पुर्नस्थापना खर्च भरण्याबाबतच्या कालावधीत सवलत व मंजूर आरक्षण पुढे चालू ठेवणे इ. बाबी शासनाच्या विचारधीन होत्या. याबाबत संदर्भिय क्र. १ व २ येथील निर्णयाच्या सलगतेने संदर्भ क्र. ७ च्या शासन निर्णयानुसार मा.मंत्रीमंडळ उपसमितीच्या मान्यतेने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

## ३. शासन निर्णय :-

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या पाणी आरक्षणास खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार व परिच्छेद ४ मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नांव | पाणी वापराचा प्रकार | जलाशय/ कालवा/ नदीचे नांव | मंजूर केलेले पाणी आरक्षण (दलघमी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | पिंपरी चिंचवड महानगरपालिका पिंपरी जि.पुणे | घरगुती (पिण्यासाठी) | पवना (टप्पा-४) | ४८.५७६ दलघमी |
| २ | | घरगुती (पिण्यासाठी) | आंदा मध्यम प्रकल्प/इंद्रायणी नदी/देहू येथील को.प.बंधारा | ३८.८७दलघमी |
| ३ | | घरगुती (पिण्यासाठी) | भामा आसखेड प्रकल्प | ६०.७९दलघमी |

४.उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक तत्वे महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग शासन परिपत्रक क्र. बिपापू १००१/(७१३/२००१)/सिंव्य(धो), मुंबई- ३२, दि. ७/४/२००३ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

२. शासन परिपत्रक क्र. पापव -२०१५६/(प्र.क्र.४००/२०१५)/सिव्य (महसूल) दि.१५/१२/२०१५ अन्वये बिगरसिंचन पाणीवापराचे करारनामे करणे व नुतनीकरण वेळेवर करणे बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/(प्र.क्र.८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि. २१/४/२०१६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

४. महाराष्ट्र शासन,जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१०/(४०७/१०)/सिंव्य (धोरण), दि. २९/६/२०११ अन्वये करारनामा करताना बिगरसिंचन पाणीवापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्पाटप्पाने पाणीवापर करण्याचे नियोजन नमुद करु शकतील.

५. शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे), दि. १७/११/२०१६ अन्वये पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणीपट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या

कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणेसाठीचा निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

६. महानगरपालिकेस सिंचन पुर्नस्थापना खर्च एक रक्कमी रक्कम भरणे बंधनकारक करण्याऐवजी सन २०१८-१९ पासून पुढील ५ वर्षात टप्प्याटप्प्याने समान हप्त्यात भरण्यात यावे.

७. पहिला हप्ता भरल्यानंतर जलसंपदा विभागाशी करारनामा करण्यात यावा. व करारनाम्यात उपरोक्त अटीचा समावेश करण्यात यावा.

८. पाणी उचलण्याची /पुरवठयाची जागा व क्षेत्रिय परिस्थितीनूसार इतर अटी शर्तीचा अंतर्भाव करून संबंधीत मुख्य अभियंता यांनी सविस्तर ज्ञापन तात्काळ निर्गमित करावे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१०२४१६१८२१३७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.10.24 16:27:41 +05'30'

(अ.अ.कपोले)
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१० प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे.
१३. मुख्य अभियंता (पा)व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे.
१५. आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पुणे
१६.अधीक्षक अभियंता , पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे.
१७. निवड नस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)